गोपनीय

शासकीय कर्मचा-यांची नियत सेवावधीपूर्वी निवृत्ती

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक एसआरसी-१०८५/६६०/४७/पंधरा,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १७ डिसेंबर १९८५.

संदर्भ :- [१] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरसी-१०७०/३, दिनांक १४ सप्टेंबर १९७०.

[२] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरसी-१०८२/९५२/पंधरा, दिनांक १ सप्टेंबर १९८३.

परिपत्रक :- वयाच्या ३५ व्या वर्षापूर्वी सेवेत आलेल्या वर्ग १ व वर्ग २ च्या अधिका-यांच्या वयाची ५० वर्षे पूर्ण होण्यापूर्वी किंवा अर्हकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण होण्यापूर्वी तसेच वयाच्या ३५ व्या वर्षानंतर सेवेत आलेले वर्ग १ व वर्ग २ चे अधिकारी आणि वर्ग ३ चे कर्मचारी यांच्या वयाची ५५ वर्षे पूर्ण होण्यापूर्वी शासकीय सेवेत रहाण्याबद्दलची त्यांची पात्रापात्रता अजमावण्यात येते. या प्रयोजनासाठी संबंधित कर्मचा-यांचे गोपनीय अभिलेख, शारीरिक पात्रता व सचोटी यांचे मूल्यमापन केले जाते.

२. अकार्यक्षम व संशयास्पद सचोटीच्या अधिका-यांना/कर्मचा-यांना शासकीय सेवेतून कमी करणे हा पुनर्विलोकनाचा उद्देश परिणामकारक रीत्या साध्य करण्याच्या दृष्टीने खालील नमूद केलेली कार्यपध्दती निश्चित करण्यात आलेली आहे :-

[१] विशेष पुनर्विलोकन समित्यांनी संबंधित विभाग प्रमुखांना योग्य आगाऊ सूचना देऊन समित्यांच्या बैठकींना आमंत्रित करावे.

[२] अशा बैठकांच्या वेळी उपस्थित विभाग प्रमुखांनी ज्या अधिका-यांची/कर्मचा-यांची सचोटी संशयास्पद आहे अशांबाबतची संपूर्ण माहिती सबळ पुराव्यासह समितीपुढे सादर करावी.

कृ. मा. प.

एच-६८१[४०००-१२-८५]

[३] विभाग प्रमुखांनी संशयास्पद सचोटी असलेल्या अधिकाऱ्यांची/कर्मचाऱ्यांची यादी वर्षारंभी जानेवारी महिन्यात तयार करावी व सदर यादी अद्ययावत गोपनीय अभिलेख, सबळ पुरावा व माहितीसह प्रशासकीय विभागाच्या सचिवांना सादर करावी.

[४] अशा यादीत अंतर्भूत केलेल्या अधिकाऱ्यांच्या प्रकरणी ५०/५५ व्या वर्षी करावयाचे पुनर्विलोकन झाले असले तरीही त्यांच्या बाबतीत पुनर्विलोकन समितीने त्यांच्या प्रकरणाचे पुन: पुनर्विलोकन करावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

मुकुंद स. मोकाशी,
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति

१] राज्यपाल यांचे सचिव,
२] मुख्य मंत्री यांचे सचिव,
३] मंत्र्यांचे खाजगी सचिव,
४] राज्यमंत्र्यांचे स्वीय सहाय्यक,
५] शासनाचे सर्व सचिव,
६] मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालयीन प्रमुख,
७] सर्व मंत्रालयीन विभाग.

-----

रुप-६८१[४०००-१२-८५]अ.